पक्की करावी आणि रसंद ही बद करावी त्याजवरून गिलच्याणी अधिक महागाई केली होती तशात याणी रसंद बंद केली गोविंद भगवत याजकडील सरदार दाहा हाजार फौजवाला रसंद लस्करात घेऊन ( ७४ ) येत होता ही बातणी होळकर याणी गिलच्यास कळविली त्याजवरून गिलच्यानी फौज पाठऊन रसंद लुटली गोविंद भगवंत गारंद जाले तेव्हा भाऊसाहेब याची हिमत खचली लस्करा भोवता वेढा गिलच्याणी घातला लस्करचे माणूस बाहिर निघेनासे जाले त्याज-वरून अेके दिवसी गिलच्याणे हाला केली तशात विस्वासरात्र ते याणी परतविली तिसरी हालाहाला केली तशात विस्वासराव यास गोली लागली आखर जाले हे वर्तमान भाऊसाहेब यास समजले तेव्हां आंबारीचा हाती खाले बसवून घोड्यावर बसले ज्यापाजी व ( ७५ ) दत्तबावा ज्योतीबावा जनकोजी सिंदे मंडळ व आनखी दहा पाच मानकरी असे घोड्यावर बसले आगांडीस लढाईचे तोंडावर येत होते इतकियांत आघाडीवाल्याचे चित्तास संवशये आला की सरदाराचे दोन्ही हांती बसावयाचे कारण काय हा अदेशा प्राप्त होताच लढाई कमती पडताच गरदी जाली गिलच्याणी घोडेच घातले खंदक बुजून निघाला अैसे लस्कर अडिच लाख सवार पयेदळ गारद जाले काही कार्य कारण राहिले पळोन बाहेर निघाल्या होळकर याणी लुटले अैसी अवस्ता जाली विस्वासराव तरी तेथेच आखर जाले ? भाऊसाहेब व ( ७६ ) सिंदे व होळकर व आणखी दहा पाच मानकरी गरदीत जाले ठिकान लागले नाही तुटेफाटे कोन्ही वाचले ते नाना पुरदर व नाना फडणवीस व पारवतीबाईस समागमे घेऊन देसी आले कलम

१ सन १२६८ फसली

१ नानासाहेब याणी भाऊसाहेब व विस्वासराव याचे वर्तमान आयकून दुखन्या पडले होते चिंतेने दोन महेन्याणी निजधाम आली आस्विनमासी काळ जाला

१ गादीवर माधोराव भाऊसाहेब बसले

१ हेंदरजेग नबाब याचे दिवानाणी पासष्ठ लक्षाचा मुलुक दाबला

१ राघोजी भोसले याची पत्र दादासाहेब यास आली ( ७७ ) की गढे मडळवाले राजे बहुत जबरदस्त जाले आहेत आम्हास माणीत नाहीत आमचे मुलकात खंडणी घेऊन अमल बसविनार हा बेत त्यास एक वेळा इकडे यावे म्हनजे पारपत्ये करितो त्याजवरून याणी फौजची तयारी मांडली कलम

१ निज्याम अलीखा बहादूर याचा इजाहार हायेद्रजगाचे चितात की चवघा भावा पौ हाच काबिल जबरद्स्त आहे याजकडे आळजपूरचा सुभा आहे तेव्हा हिशोब किताबचे फेरात आणून भावा भावासी वाकडे आणौन कैद करावे हा बेत हैंद्रजंगानी या उदेशे एक वरशभर निज्यामअलीखां ( ७८ ) यास आळजपूराहून आणून हिशोबाचे अैवजाचे धोरात घातले होते निरोप देइनात निज्याम अलीखा बेजार जाले आणि दवलतीचा कारभार हायेद्रजगाकडे हमेशा सुभेदार आणि याजपासी दोन च्यार मुदसदी येलची होते कोन्ही मुक्तार नव्हते काम जातीवरच कृताकृत विच्यार जे पडल्यास विठल सुंद्र यास विचारावे त्याजवर मात्र लोभ अैसा क्रम होता विठल सुंद्र संगमनेरकर राहणार पूर्वी कवीजगाकडे चाकर होता निज्याम अलीखा याची व कविजगाची भेट तादुळाज्यावर जाली ( ७९ ) तेव्हा कवीजगा बो विठल-सुद्रही येत जात होते बोलण्यात खबरदार पाहिले तेव्हा कवीजंगापासून विठल-सुंद्र यास मागोन घेतले की आम्हापासी कोन्ही हुषार नाहीत विठल सुद्र यास आमचे जवळ ठेउन द्यावे तेव्हापासून याजपासी होते हाली औरगांबादेवर नवाबाची छावणी निजामअलीखास यास निरोप देईना हायेद्रजेंग निरोप देईनात तेव्हा मोठे सकष्टात होते अेके दिवसी निजामअलीखा याणी विठल सुद्र यास विच्यारले की आपणास येथे येऊन येक वरीश जाले हैद्र जगांसी वाकडे याचे सा ( ८० ) गन्यांवर आपला भाऊ निरोप देईना तिकडे मुलुक भोसले याणी खरांब केला याची सल्ह कैसी करावी याणी सागितले की आपलेकडे सरदारी नाही की च्यार लोक सरदार आपले लगांमी असावे पयेका जवळ नाही पयेक्यावर अवधी साधणी होतात दोन्ही नाही तेव्हा हैद्रजगांसी सलूक करावा तो सांगितले ते अैकून निरोप घेऊन जावे निज्यामअलीखा याचे म्हणने की काही हैद्रजगासी सरेन जाणार नाही यापरीस मरण आले तर बरे यैसे निज्याम-अलीखा बहुत श्रमी जाले तेव्हा विठल सुंद्र याणी विनंती केली की आपण श्र ( ८१ ) मी होऊ नये आग्रह मात्र असावा तुमचे बधू नबाब वगैरे आहेत याजवळ विशेष अैवज दिसून येत नांहीत येक हौद्रजंग मातर आहेत याचे पारपत्य कयेसे होईल हे सलाह सांगा त्याजवरून विठलसुद्र याणे अर्ज केला जे आपन स्वस्थ असावे याची सलह निंबाळकर व जाधवराव वगैरे करोन सरदार आहेत यासी बोलून सल्हेत त्यास घेतो म्हणजे सहजात विच्यार पाहून या जेवाबावर मर्जी ते समई निज्याम अलीखा याणी खुश जाली विठलसुद्र

यास सांगितले की सरदाराकडोन लांबी रुंदी पहात जावी तेव्हापासून विठल सुंदर (८२) याणी जाऊन निज्याम अलीखा याचा निरोप जाणजी निंबाळकर यास सांगितला त्याजवरुन निंबाळकर याणी सांगितले की तुम्ही मालीकच आहात उमेद धरा म्हणजे सहजात पारपत्य होईल परंतु मजकूर फुटून द्यावा आणि हिमत असू द्यावी येका दो दिवसा बिंडकर निंबाळकर व सलगे पांढरे व छोटे मोटे मुसलमान अवघे माझे सल्हेत आहेत त्याचे अन्न घेऊन अवघे सरदार मी आपले मकानावर बोलावितो तुम्हास सूच (८३) ना पाठवू तेव्हा तुम्ही येणे म्हणजे अवघ्याकडून रुबकार वचेण तुम्हास देवितो येक जाधोराव आम्हासी त्यासी वाकडे आहे. मी त्यास काही म्हणार नाही आणि हैदरजेंग याचे दोस्त त्याजवर कृपा त्याची आहे तुम्ही त्याजकडे जालतर बहुत विच्यारे जाऊन सल्ह घ्यावी ते पत्यावर ठेवणार नाहीत परंतु तुम्ही बहुत विचयारे त्यासी मजकूर विच्यारावा पत्यावर न आले तरी न येवोत परंतु बातनी न फुटावी असे व्हावे येसा बहुत प्रकारे बोध व खांतर (८४) जमा करून वाटेस लाविले त्याजवर याणी येऊन निज्याम-अलीखा यास मार सांगितला की जाणूजी निंबालकर याजकडे गेलो होतो त्याणी बहुता प्रकारे खातरजमा केली अस्ता जाधवराव याजकडेस जाऊन त्याचे अंतर घेतो निज्यामअलीखा याणी सांगितले की ते सरदार भारी आहेत पधरा हजाराची त्याची जमियेत त्याजकडे जाऊन बहुतेक विच्यारे गोष्ट काहाडावी नाहीतर उद्याचे मरण आजच होईल येसे न होये या प्रा बोलून त्यास जाधवराव याजकडे पाठविले याणी प्रथम (८५) त्यास हेच विच्यारिले कीं नवाब हैदरजंग आमचे नवाब निज्याम अलीखा यास निरोप होत नाही याचे कैसे करावे तुम्हीं मातबर सरदार आहात हौदरजेंगासी बोलून सफाई करुन निरोप देवावा जाधवराव याणी सांगितले की तुम्ही नवाबाचे भाऊ मालकच आहांत हायेदरजेंग कारभारी त्याचे मनांत तुम्हा विंशई कल्पना भारी आहेत तेव्हा आमचे बोलण्यांने व्हावयाचे आहेत आणि आपण म्हणता तेव्हा संधि पाहून बोलू जाल्यास उत्तमच आहे येसे द्वांमोशाचे बोलने बोलून निरोप दिल्हा जाधवराव याची अंतरंग होयेदरजंगाकडे हे याचे जाणोन ध्यानास आणौन निजामखा यास समजाविले (८६) नंतर जाधवराव याजकडे जान्याची लगटच सोडून दिल्ही जाणोजी निंबाळकर याणी अवघे सरदार आपले घरी बालाऊन भरोभरी देऊन सवार केले नंतर विठल सुंदर यास बोलाऊ पाठविले त्यास आणौन अवध्याची वचणे जाले इत्यर्थ ठहरला की निज्यामअलीखा याणी आपले मकानावर ज्याफतीस नवाब वगैरे अवघे सरदार

हायेद्रजंगा सुध्या बोलऊन घ्यावे आणि डेऱ्यांतच कैद करावे विठलसुद्र बोलले की तलवार चालेल जाणोजी निबाळकर वगैरे बोलले की तलवार चालली तरी पाहून घेऊ जाधवराव मात्र त्याजकडे आहे (८७) त चिंता नाही हा निछये ठहराऊन मकानास विठलसुद्र येऊन निज्यामअलीखां यास मंजकूर जाला तो समजाविला तिकडे हौद्रजंग याणी नवाबास गैरवाका समजाविला की छोटे नवाब आपणास कैद करणार आहेत बेअदबी बोलतात मी तरी ताबेदारच आहो नवाबाणी उत्तर केलें की मी त्यास सांगतो ते काही माझे रूबरु बोलणार नाही ते सागतील ते येकितील तुम्ही कचेरीस बोलऊ पाठवावे मी येतो हौद्रजंगाचे चित्तांत की अपण रुबरु कटकट काहडावी निज्यामअलीखा आदिक आगले बोलू (८८) लागले म्हणजे नवाबास रांग आणौन कैद करावे हा बेत याचा त्याणी तो बेत करविलाच आहे इस्वेर इछेने दोन्ही बेत येकूकडेस राहिले तिसराच उभा राहिला येके दिवसी नवाब बंरामदं जाले नव्होते कचेरी भरली म्हणजे नवाब येणार तो हायेद्रजंग कचेरीत आले होते निज्यामअलीखा व विठल सुद्र हे ही आले कार्याकारण भरत चालला होत हायेद्रजंग व निज्यामअलीखा व विठलसुंद्र हायेद्रजेंग व निज्यामअलीखा बोलत बसले बोलता बोलता हिशोब कितोबाचा जिकर निघाला बोलता बोलता वाढ (८९) ली विठलसुंद्र मागे उभेच होते याणी जलद्रीचे समई हायेद्रजंगाचे पुढे तलवार होती ते उचली गुडघ्याणे नवाब निज्यामअलीखास डवचले निज्यामअलीखांन पेशकब्ज काहाडून हायद्रजेंगास हाणिले विठलसुंद्र याणी त्याचेच तलवारीने वार टाकले दोन वाराणे हैद्रजेंग पूरा जाला आणिक कचेरीचा डेरा चिरोन निज्यामअलीखां व विठलसुंद्र बाहेर निघाले घोडयावर सवार जाले इकडे गलबाल जाली इतक्यात जाणोजी निंबालकर याची सवारी कचेरीत येत होती याची त्याची गाठ (९०) पडली च्यारपाचशे मणुस बराबर होते त्याचे त्यांचे सेभर दोनसे डेऱ्यापुढे होते काही लुटली काही मारली गेली जाणोर्जीस निज्यामअलीखांने वर्तमान सांगताच आता का चालतात समये हाच आहे इतक्यात लोकासही इशारा करोन हाजार दोन हाजार लोक व निज्जामअलीखां व विठलसुंद्र याणी नवाबाचे भोवता घेरा घालून केद केले नवाब अवरंगांबादी होते ते डेरे बाहिर काळया चबुऱ्यावर दिल्हे होते हायेद्रजेंगा सुधा हायेद्राबादेस जाणार या बेतात तो येसी गोष्ट जाली तेच दिवसी जाणोजी वगैरे सरदार (९१) मिळोन निज्यामअलीखास मिरवत नेऊन शेहेरात त्याचे वाडयात नेऊन बसविले द्राही नवांब निज्यामअलीखानाची फिरली तेच दिवसी

माही मरातबे जाणोजी निंबाळकर यास दिले पूर्वी नव्हते विठलसुंदर यास दिवानगिरीचे वस्त्रे जाली आणि कितांब राजे प्रतापवंत बहादुर ते दिवसापासोन निज्यामअलीखां सरदार गादीवर बसले सलाबंत जंग मोगलअलीखां कैद जाले

कलम सन ११६९ फसली

१ मल्हार होळकर याची पूर्वोतर पासून श्रीमंताची सरकारातून नाइतेफाक चित सुद्धता नव्हो ( ९२ ) ती ते गायकवाड याचे मारफातीने त्रिंबकावर सलूक होऊन भेटी जाल्या

१ सिंद्याचे दवलतीत खासा नव्होता बाया मात्र सकूबाई भागेर्थीबाई व सगुनाबाई अशा होत्या मुलकाचा फौजेचा कारभार दोनतीन वर्शे रामचंद्र बाबा शनवई याजवरच होता दादासाहेब याचे चितात कीं दत द्यावा तेव्हा नाना फडनवीस व महादजी सिंदे याचा स्नेहे भारी ते वेळेस नानाणी दादासाहेबास विंद्री करून पाठविल बाबा याहास सरदारीची वस्त्रे देवीली तो उपकार नानाचा मानिलेवर आहे कलम

१ राजे रामचंद्रराव जाधोराव मोगलाई कडील विठल ( ९३ ) सुंदर याचे सल्हेत हैदरजगाचे वळेस नव्होते तो कसूर धरून जाणोजी निंबाळकर याची त्याची आगांडीची कटक होती ते नंमूद करून त्याची याची लढाई लावली आणि मुलुक जप्त केला तेव्हा निंबाळकरानी जाधोराव यास लुटले जाधवराव पळाले तेव्हा तीन लक्षाची जात जागीर मात्र ठेवली बाकी जप्त केली

१ दादासाहेब व सिंदे होळकर गायकवाड वगैरे बंगाल्यात रघोजी भोसले याजकडे गेले ते हे मिळोन गढेमंडळचे पारपत्य करून कांहीं मुलुक घेऊन बंगाल्या पावेतो काही मुलुक आणि पणासा लक्ष्याचा मुलुक नवा साधिला तो भोसले यास दिल्हा पूर्वी करोडींचा हो ( ९४ ) ता आता दीड करोडींचा सरजाम आला आखरसाली देसी आले रघोजी भोसले आखर जाले मुधोजी राजे यास वस्त्रे पाठविले कलम

१ दादासाहेब नागपुराकडून येताना धोडोराम यास पत्र पाठविले आणि मुकाम माहोरावर केला हौदरजेगाणी पासंष्टी लक्षाचा मुलुक घेतला तो द्यावा नाहीतर आम्ही घेतो त्याजवरून वकीलाणी मजकूर विठल सुंदर यास कळविला त्याणी उतर सामोच्यारे केलेली म्या काही घेतला नाही माझे कारभास दोन वर्शे अद्याप जाले नाहीत हैदरजंगाणी घेतला त्यास मी कामात आहेतच तेव्हा युक्तीणे

मुलुकही देईन तूर्त लढाईचा प्रसंग ( ९५ ) न घालावा याचे उत्तर येतो पावेतो मुकाम माहोराकरच होता मग तैसे लिहिले आले तेव्हा स्वारी पुन्यास आली

१ सन ११७० फसली

१ कर्नाटकात खडंणी महालो महाल पूर्वी होती तैसी हौदर नाईक याणी एक लाख देत जाऊ म्हणौन ठहराविला आणि अखंड जमीदाऱ्या मोडल्या

१ अनवरदिनखा आरकाटचे सुभे चेनापटणास राहतात याचे चिरजीव मााद अलीखा उर्फ बालाज्याहा नबाबाचे चाकर अनंवरदनिखा होते त्याणी काही पायेरीस पाये लाविला नाही नबाबांसी रुजू होते त्याचे माघे मााद अलीखा याणी काही नबाबास माणीले नाही — कलम ( ९६ ) आपणच तिकडे मालक जाले होते त्यासी व फरांसिसासी हमेशा कटकट होत होती याज करिता कलकत्त्यास सैद जंबारखा व संतुकराये पाठवून दोन पलटणे चाकरीस आणविली दोन लाख रुपये नगदी दरमाहा देत जावे करार करोन चिणापटनास आनविले इग्रजाचा पाये सिरला या पूर्वी त्यास दक्षनेत बसावयास ठिकाण एक मुंबई होती हे दुसरे ठिकान जाहले पूरवी मुंबई इंग्रेजाचे चाकर हफसी होते त्याचे सरजामात होती तेव्हा हफंशाचा सरदार मकेस गेला तेथून इग्रेजाणी त्यास जाप्त केला व तिकडे चीजा नानाप्रकारच्या देऊन खुश केले ( ९७ ) तेव्हा हफशासी म्हणो लागले की आम्ही चीनच्या जिनसा आणु परंतु आम्हास माल ठेवायास जागा नाही मुंबई बेट द्यावे ते मालिक हफसी जबरदस्त होते त्याहापासून मुंबईत सवंदागर साहेब राहात होते सरदार जमियेतवाला साहेब आता चिणापटणास सरदार आला तेव्हा दक्षनेंत पाय सिरला जानावा

१ सन ११७१ फसली

धोंडीराम यास पत्रे सरकारची जातच होती की पासष्ट लक्षाचा मुलुक घ्यावा तेव्हा विठलसुदर देतो म्हणौन बोलत गेले साल मजकूर काय जाहले दादा साहेब यास सरदारीवाले समस्त ( ९८ ) राजे रघोजी भोसले यासी पैक्याचा श्रम भारी करोडी रुपये भोसले यास कर्ज मागित होते ते हुजरे जाऊन बसले त्या अक्षेने जाणोजी भोसले यासी मुधाजी बाबास सनंद दिल्ही की आपण नवाबासी पयेगांम बांधून ते आपण येक होऊन पेशव्यासी लढाई घेऊन पुने लुटू ते जे पैका मागतात हा सिबंदी खर्च करु त्यास पैसा देऊ नये याचे पोटी जे होईल ते हो हा नेम करुन नवांबाकडे पयेगाम बाधला विठलसुंदर याचे चितात ही गोष्ट होतीच ते ज्याहादार तशांत हे ही सामी ( ९९ ) ल जाले त्याजवरुन नवाब निज्यामअलीखा यास मजकूर समजाविला त्यास हे

वाटले की जैसे हौदरजंगाचे पारपत्य केले असे येश आले तैसे हे ही होईल आशा सुटली रुकार देऊन फौज तयार करविली उमगले धोडोराम रोज च्य पोटाप्रमाणे विठलसुदर यास बोलायास गेले याणी साफ जबाब दिल्हा की आम्ही मुलुक देववयासाटी दाबिला नाही फार तुम्ही लढाईचे भये दाखवाल तर आम्हासही लढाई घेने जरुर अथपर ही गोष्ट काहडीत न जावी असी जबरदस्तीचे उत्तर जे जाहले हे येकून हे जबदस्ताचे वकील होते उतरास प्रतिउत्तर (१००) देऊन भोसले हे येक जाहले ही बातणी अवंगड कळल्यावर अवघा मजकूर दादा साहेबास राग यावयाजोगा लिहून पाठविला पत्र पाहाताच दादासाहेब खफा होऊन फौजची तयारी मांडली होळकर सिंदे गाईकवांड याजला बोलावून आन-विले भोसल्याकडे हुजरे गेले होते मा। निलेनी उठाने दिल्हा

१ सन ११७२ फसली नबाबांची सवारी हायेद्राबादे हून कूच करून गोरदपवाडीवर मुकाबिला तीन दिवस होत होता सेवटी पेशव्याचे फौजेने वाट खाली नबाब निज्यामअलीखा याणी नीट पुन्याचा रस्ता धरला पुन्यास जाऊन काही घर (१०१) लुटली व काही आगी दिल्हया काही खंडणी ही घेतली तेथून नाशकास आले तेथेही ऐसाच उपद्रव केला तेथून कायेगाव टोके लुटले येशव्याणी दवंडीहून निघाले ते अवरंगाबादेस खंडणी कासम सुभेदार होता त्याज-पासी बारालाख रुपये घेऊन हायेद्राबादेकडे चालले ते याचे वर्तमान आले विटल-सुदर जालितो आणि लुटितो त्यास याचा बदला करावा तेव्हा मल्हारजी होळकर म्हणाले कीं विटलसुदर फारच चहडला आहे शहेर जाळल्याणे गरीबाचा मात्र नाश होईल त्याचे पारपत्य होये ते करावे त्याजरून दादासाहेब बोलले की लढाई कडवी घ्यावी बोलणी होत होती तेव्हां सुभेदार बोलले कीं कडवी लढाई जाली तर नाश दोघाचा होईल येश अपेश ईश्वराकडे त्यात तुमची व त्याची चो (१०२) ळीदामनाचा लेखा लिहिले पुसले आहेत हा जिकर भारी असला तर आपले नवाबाचे दोन्ही दवलतीस अपाये करील याचेच पारपंत्य होये येसी सल्हा काढावी कोन्हास उत्तर सुचले नांही सुभेदार बोलले की आपण स्वस्थ असावे याचा पयेगाम करीतो तेव्हा भालकीवर वीस मुकाम जाहले सुभेदार याणी आपला वकील नवाबाचे लस्करात पाठविला त्याणी मुरादखा पाच हजार फौजचा सरदार होता त्याची भेट घेऊन फितुर केला पाच लाख रुपये विटल सुंदर याचे डोंकसे मारिले म्हणजे द्यावे असा करार मुरांदखांने सांगितले तुमची फौज येऊ देणे लढाई लागली म्हणंजे हा योग घडंल असी वकीलाची पत्रे आली तेव्हा

भालकी ( १०३ ) हून माघारा फिरले नवाब विठल सुंदर टोक्यावर गंगा उतरुन अलिकडील काठाने चालले तितक्यात गंगेस पाणी आले की जलद येणे याणी तुळजापुराहून कूच केला ते दुसरे दिवसी धोंडी तीरास आले नवाबाचा मुकाम राक्षसभुवनावर भोसले समागमेच होते श्रीमंताची सवारी फौज आली म्हणोन भोसले याजला कळताच आधी गंगा उतरले पेशव्याणी येताच लढाईचे तोड लाविले लढाई सरु जाली दोन दिवस तोफा गोळ्याची लढाई जाली आशाडांचा महिना मोगलाईचे फौजेस मागे पुढे सरावयास जागा नाही तेव्हा तिसरे दिवशी लढाई कठिण तलवारीची जाली लोक हातघाईवर आले तव्हा दादासाहेब याचे हाती भोवता वेढा मोगलाई फौजेचा पडला रा ( १०४ ) णोजी घांडगे याणी तलवार तेच वेळेस केली तेव्हा हरकारे याणी सुतरनाल मध्ये घातल्या तेव्हा हाती भोवता सरजाम मोगलाईवाला होता तो वितळला हाती मोकळा जाहला इतकियात सरकारच्या पांगा वगैरे दहा पधरा हजार सरजाम नेमला तिकडे मुरादखान यानी काये केले की प्रतापवंताचे हाती भोवंती जमियेत खासगंत मवसूफ याची होती येक बारगीर यास सागोन ठेविले की येथून हाती प्रतापवंताचा हालला म्हणजे बाजूस होऊन बेलाशक बारजोड गोळ्याचा बाजारबाट नेम करून आपण राज्याजी जवळ आले आणि बोलले की मऱ्हटे याचा हाती सापडला आहे तेथे तलवार चालत आहे आपला हाती येथून पुढे चा ( १०५ ) लला म्हणजे राघोबादादाचा हाती सापडला आहे पाडावू होतो आम्ही घोडे घालितो राजे विनायकदास मा॥ निलेचे पुतने हे घोड्यावरच होते ते दोन हजार पठानांसी महादजी सिंद्याचे तोंडावर उठावले पठानानी तालवार भारीच केली सिंद्याकडील तीन सरदार हाजार बारासे सवार मारले सिंदेवाले याणीही पाच सातसे पठान व विनायेकदास याचे डोकसे कापून गरदी अेकच जाहली इकडे प्रतापवत याचा अऊडभर पुढे ढळला व इतकियात जोड गोळ्याने प्रतापवंताचे डोकसे उडाले दोन डोकसी दोन्हीकडे कापल्याणे गरदी येकच जाहली मोगलाई लस्करास पळावयास जागा नाही मागे गगा पुढे लढाई गरदी होताच निज्यामअलीखां यास अष्टीवाले जाहांगीरदार याणी दोनसे स्वारानसी गंगा ( १०६ ) उतरुन अवरंगाबादेचा रस्ता धरिला होळकराची फोज दाहा पाच हाजार नवगावर गंगा उतरली ती पलीकडेच होती त्याणी निज्याम अलीखा यास अटकाविले होळकराकडून फितूर होताच विठलसुंदर मेला विनायेकदास मेला निज्यामअली पळाले ही अवघी बातणीच त्यास होती ते समई आपले सरजामास सागोन

पाठावेले की नवाबास जाऊ देणे त्यास उपकार दाखविला भोसले पलीकडें आगाडीसच होते नवाब गंगा उतरताच भोसले याणी नागपूरचा रस्ता धरिला इकडे गरदी जाली तेंव्हा जो हुशार सवार जरबंद कापून गगेंवर घोडे घातले जो गाफील तो जेरबद कापावा यास अवसर नाही तसाच गगेंत सिरला असे दहा-वीस हजार सवार ( १०७ ) सुधा गगेंत बुडाले नवाबाचे फौजचा असबाब खाशासुधा गणीमवाल्याणी लुटला मनस्वी धण लोकाहीस सापडली दूरला सवार जो होता त्यास होळकराचे सवार लुटीत मुरादखा असबाबसहितसुधा होळकराणी रस्ता दिल्हा ते संगमनेर गावावर गंगा उतरून अवरंगाबादेस गेले कार्याकारण फौजही आपले लगाने असबाब चालला आहे तर न कळे बाकी जीव घेऊन वाचले ते अवरंगाबादेस गेले या बेटचे गाव व त्या बेटाचे गाव ते वेळेस अभर जाले सारांष सलतंन नवाबाची सारी बुडाली हेही गंगा दोन तीन दिवसानी उतरून अवरंगाबादेस वेढा घातला तेंव्हा नवाब निज्यामअलीखाबहादुर याणी कृष्णराव बलाळ वकील याचे हातानी तह केला पासष्ट ल ( १०८ ) क्ष्या रुपयाचा मुलुक दिल्हा कृष्णराव बलाळ यास बहुत बहुत अर्जुनी नवाब बोलले की आमचे भाऊ आहेत राव पंडित प्रधान याचे फौजचा कूच करावा त्याजवरून कृष्णराव याणी मधे डवला मिरवून दादासाहेब व रावसाहेब यास समजाविले की नवाब आपण येकच दरमियान विठलसुंदर याणी वाकडे आणिले याणे दवलत गारद जाली आता पासष्ट लक्ष्याचा मुलुक आपणास आला त्यास आपला काही उपकार ठेवावा तेंव्हा दहा लक्ष्याच्या ज्याहागीर नवाब संनदा करून देविल्या आपण नवाबापासून गणेरी ज्याहागीर मेळविली श्रीमताची सवारी अवरगाबांदेहून पुन्याकडे चालले होळकर या ( १०९ ) चा उपकार थोडासा होता तो सरजाम याणी अडविले पुन्हा जाऊ दिल्हे त्याजवरून अंबडच्या संनदा आहेल्याबाईस चोळी म्हणून दिल्ह्या तेंव्हापासून होळकर याचा वकील नवाबापासी राहू लागला नाहीतर याचे वकीलाचे कारण नाही फितुरापासून प्रारंभ राक्षेसभुवनाचे येश याप्रमाणे आले कलम

१ सन ११७२ फसली

१ माधोराव साहेब जातीने कारभार करू लागले कृताकृत दादासाहेब स्वाधीन काही नाहीत कार्याकारण बदोबस्त करीत चालले

१ हिंदुस्तानातून पत्र व सनंद होळकर बुंधेल याची आली की नजीमखा दिलीत वजारतीचे काम करितात शाहा ( १०९ ) १०८ आलम बादशाहा यास

माणीत नाहीत व आपली खंडणी राजे रजवाडे याजकडोन येणे त्यास सालमज. कुरी अटक केली आम्हास अैवज द्यावा राजे शाहुवाले दक्षेनचे यास अैवज न देणे बाहेर निघणार त्यास आपली सवारी इकडे यावी असी पत्रे आली— कलम

१ सन ११७४ फसली हिंदुस्थान रवानंगी नजीमखांनावर सरदार रामचद्र गणेश कारभारी व विसाजी कृष्ण यास बरोर फौज चाळीस हजार देऊन रवानंगी केली दादासाहेब याचे चितात की त्रिबकराव मामास पाठवावे तो राहून या उभये-तास पाठविले दरमियान यासी व त्यासी बनना तेव्हा रामचंद्र गणेश जेवाइयास बोलाऊन घेतले विसाजी कृष्ण सरदार व दिवान तेच पुढे गेले सिंदे होळकर (११०) व गोविंदपंत बुधेलेही येऊन मिळाले

१ सन ११७५ फसली

१ हौदर नाईक याजकडील खंडनी सुरलीत येईना जाणून पुन्याहून सवारी रावसाहेब याची निघाली व नाईकही तिकडून आले यांची व त्याची लढाई जाली हायेदर नाईकाणे कच खाली पळू लागले पळता पळता तुंगभद्रेने वाट नायेकास दिली मागून रावसाहेब गेले नदीस उतारा नाही जलद्च होते तैसेच घोडे ढकलले हजार दोन हजार घोडी जाया जाली परंतु नाईकास घेरून खंडनी चिंनापटंणाहून नव्ह लक्षाचा मुलुक घेतला वरकड तमाम खंडन्या सर्व स्था-नांत घेऊन पुन्यास आले— कलम (१११)

१ येके दिवसी पर्वतीवर बसले होते खाले हातीची लढाई लाविली होती त्यापैकी एक मस्त हातीने चाल केली रावसाहेबाचे जवळ यावयास लागला कितीक लोक त्यास उठा म्हणौन बोलले तेव्हा काही उठलेच नाही से पनास खासे जवळ होते त्यातून आपाजीराव पाटनकर व खडेराव दरेकर दोघे उठोन पुढे होऊन हातीस सागाड मारल्या बोवा माहोत वर बसला तो घाबरला हाती काही आवरेना तेव्हा त्यास या उभयेताणी सागितले की दुशाला डोळ्यावर टाक आणि दाभा-डांत अंकुश घालोन मागे वढ आम्हीं सांगोन मारून डोंगराखाले घालू तव्हा बोवा माहोतानेच तैसेच केले आणि हाती माघारे माणूस जाया न व्हाता नेला तेव्हा रावसाहेब सतोष होऊन आपाजीराव पा (११२) टणकरास जात जागीर देऊन मानकऱ्यात असामी लिहिली बोवा माहोतास पागा दिल्हीं खडेराव दरेकर यास लस्कर सागितले जरी पटका दिल्हा पूर्वी लस्करास निशान नव्होते मामले लस्कर

जाणोन त्याचे नाव लस्कर आता जरीपटका दिल्हा तेव्हा मानकरी वगैरे तैन तीस जाऊन मागतील असा नेम ठहरला कलम १

फसली सन ११७६

१ दादासाहेब याचे चितात की आपणास पुत्र नाही दत घ्यावा राव साहेबाणे सागितले की नारायेणराव आहे यास दत घ्यावे त्याचे चितात न आले त्याणे मेव्हन्याचा पुत्र आणून अमृतराव दत घेतला तव्हा कळीस आरभ जाला कलम

( ११३ )

१ मल्हारजी होळकर आखर झाले म्हणौन इसाजीपंत यास पत्र आली त्याजवरून रावसाहेब यानी तुकोजीबावास वस्त्र सुभेदारीची पाठविली—कलम

१ सन ११७७ फसली मुधोजी व साबाजी व जाणोजी व बिंबाजी भोसले चौघे भाऊ याणी राक्षेसभुवनाचे सवारीस फंद करुन निज्यामअलीखांन यास मिळाले हे मनांत होतेच त्याजवरून रावसाहेब याची सवारी उमरावतीवर आली तिकडून भोसले भेटीस येतो करोड रुपये खार्चासही देतो असा करार करुन नागपूर सोडून अलिकडे आले त्याचे याचे अंतर पाच पचेवीस कोसाचे राहिले तेव्हा भोसले याचे काय मनात आले असल ते नंकळे माघारा फिरला तेव्हा रावसाहेब त्याचे मागे लागले वीस वीस कोसाचा रोज कूच असा (११४) येक महेना फिरत होते सेवटी रावसाहेबच हरले सलूक करीनात तेव्हा दरसाल पाच हजार फौजेने बारमाह चाकरी करावी पधरा लाख नजर दरसाल द्यावी करोड रुपये रोख घ्यावे असा नेम ठहेरला तेव्हा सलूक करून भेटी होऊन स्वारी माघारे आली हुजूर उठविले या अकसीने चाकरीवर नजर दरसाल मागे लागली पूर्वी नव्हती—कलम

१ सन ११७८ फसली

भाऊसाहेब व तोतिया व त्याचे कारभारी जोतीपत उभे राहिले ते कैद करून किल्यावर ठेविले तोतिया किल्यावरच मेला आणि जंगलचे स्वारीस राव-साहेब गेले होते तेथे नारायणरावसाहेबास गोळी लागली तेथील पठनास मान देऊन आणिले होते येके दिवशी (११५) लस्करात कोन्ही लटकीच आवई घातली की पठानास लुटले हे त्याजवरून दोन प्रहराची वेळा तमाम पटन लुटले ते बांतणी रावसाहेबास कळली ते म्हणाले की मजला ठाऊक नाही नस्ता कोणी लुटले त्यास वचेन देऊन आणिले असा बेकैदी जाली त्याजवरून मुनादी

मिरवली की जपासी पठानाची चीजबस्त निघेल त्याचे हात कान तोडू स दोनसे सापडले त्याचे हात कान घेतले त्या दाबानें पठानाची चीजबस्त सुतलीचे तोडच्यासुद्धा आली असा बदोबस्त दाब बसला इसाजीपंत बिनिवाले हिंदुस्थानात गेले तिकडे जाऊन सिंदे होलकर नेमून दिलीकडे गेले आलीग उर्फ शाहाआलम यास नजीमखा मानीत नव्हता बादशहाणे दिलीहून गछे करू ( ११६ ) इसाजीपत याचे लस्करात आले त्याणी त्यास नजर वगैरे देऊन इतमानाने होते ते नजीमखांस बातनी समजल्यावर तोही बाहेर निघाले याची त्याची लढाई जाली ते पुढे हे मागे असे फतरगंडा पावेतो गेले तेथे लढाई मातंबर जाली नजीमखां व त्याचा लेक थोरला कालेखां असे आखर धाकटा लेक अफतेखा व कालेखानाचा लेक गुलाबकादरखा याचा शोध विसाजीपंत याणी असे दोघे वाचले याणी ही दुसरी लढाई विसाजीपतासी घेतली दंम निघाला नाही पळून गेले लस्कर लुटले अफतेखा व गुलामकादर याचा शुमशोध इसाजीपंत याणी फार केला परंतु बातंनी मिळाली नाही शाहआलम बादशा गाजी यास विसाजीपंत याणी दिलीस आणोन बसविले तिकडून खंडण्या वगैरे तीनच्यार वरशं आ ( ११७ ) ल्या न होत्या त्या घेऊन बादशहाची ( म. फा. ) कसत घेऊन देसी आले सबब त्यास जात जागीर राक्षेसभुवन तालुका दिल्हा—कलम

पुन्यात नारायणपेठ वसविली प्राचीन नव्होती

१ सन ११७९ फसली

१ नवाब निज्यामअलीखा याचे दिवान रुकनतदवला व धोडोराम वकील पुन्यास आले होते भेटी परस्परे होऊन माघारा केले—कलम १ महमदअलीखा उर्फ वालाजाह याणी दोन पलटणे अग्रेजाचे सवारीस ठेविले होते त्याची काही तलब चहडली त्यावेळेस गस्त सरदारी म्हणौन चालीस पनांस लाख रुपये कर्ज घेतले असा अकंदर भरना करून रोकड रुपयाचा मुलुक मुलुक रतकर्ज लाऊन घेतला तीन लाख रुपये ( ११८ ) दरमाहा उचक खर्चास म॥ द अलीखा यास देतात काही येक दिवस तोही मिळनार नाही सर्वस्थान डंफगन्यात आले—कलम

१ सन ११८० फसली

राणु रावसाहेब याहाची सवारी मलकार्जुनाकडे गेली तमाम खंडन्या घेतल्या तेथे तिकडील कळवातीनींचे दुखं भरले नंतर देसी आले

१ सन ११८१ फसली ता॥ सन ११८२ फसली

१ रावसाहेब याणी नारायेणरावसाहेब यास सागितले की दादासाहेब याहाचा आट तुमच्यानी निघनार नाही माझा काही भारोसा नाही त्यास तुम्ही बा॥ र फौज देऊन हिदुस्थानास पाठविले म्हणजे तुम्ही राजे स्वस्थ कराल नाहीतर चैन पडू देनार नाही—कलम

( ११९ )

१ नानासाहेब व भाऊसाहेब याचे कारकीर्दीचे कर्ज सरकारवर होते ते हाली माधोरावसाहेब याणी मुदल वरले दोन कोटी पच्यासी लक्ष सावकारास दिल्हे आणि रोखे घेतले—कलम

१ आपण याजकडे मुलुक सिंदे होळकर गाईकवाड व भोसले सुभे कि‍र्ता याची खातरजमा करविली तेरा चवंदा करोडीची बेरीज आली

१ माधोराव साहेब याहास देवआज्ञा आली रमाबाईनी सहगमन केले नारायणरावसाहेब गादीवर बसले

१ सन ११८३

नारायणरावसाहेब याजवर गर्दी सनंवारचे दिवसी वाड्यांत जाली कारण की मा॥ र ( १२० ) निले रावसाहेब मेल्यावर काही अेक दिवस दादासाहेब याचे खर्चवर्च आनविला त्याप्रमाणेच चालले नंतर नाशकास गेले तिकडे मातोश्री गोपिकाबाई यास भेट जाली याणी दादासाहेब प्रकरणी समजाविले त्याजवरून पुन्यास येताच त्याचे खर्चवेचाची बंडाले कयेदीमानसांसारखे ब्राह्मणदेखील तिकडे जाईना अैसी तकडबंदी जाहली सखाराम भगवंत याचेही अैकीनात तेव्हा याणी त्याणी सेनापत्रे केले सुमरसिंग याजकडून धरावे धरावयाचा आनंदीबाईने अमृतरावं ( १२१ ) लहांण होते त्याजकडून करवून सुमरसिंगास दाखविले नारायणराव यास मारावे या सल्हेत सखारामबापू आहेत त्याचेही सिक्यापत्रावर सही आहे ही पाराबाबी गार्दी याणी अक्षरे पाहून उद्योगास लागले होळकर कोन्हास काही कार्तिकमास मगळवार होता पर्वतीस गेले सुमारसिंगाणी हाजरी द्यावयाची म्हणोन लोकास सांगोन लोक तमाम वाड्यात समजत चालले हारी बलाळ खवासीत होता त्याणी नारा ( १२२ ) येणरावसाहेब यासी तिकडून येताना विच्यारले की आज गारद्याची हाजरी आहे की काये ते म्हणाले की काही सागितले नव्हते आणि सवाल हरीपंत बोलले की आपणास माहीत नाहीं तेव्हा इतके मंडळ वाड्यापासी मिळावयाचे कारण काये याची चवकशी करावी रावसाहेब बोलले की मला डुलक्या येतात अमलसी

निजंतो नतर चवकशी करीन हरीपंतानी इतके सागितले की अगोधर चवकसी करावी नंतर जावे बरे आहे म्ह ( १२३ ) णोन बोलले आणि वाड्यात गेले हरीपंत वगैरे आपले आपले घरास गेले गंगाबाई साठ्याचे धरी भोजनास गेली होती हे जाऊन निद्रां केली तो सुमरसिंग वाड्यात आला चापाजी टिळेकर हुजऱ्या होता गरबंडीची बातंनी समजली तुक्या पोपावाड हुजऱ्या फितुरात होता चापाजीने रावास उठविले आणि बातंनी सांगितली आणखी म्हणाला की पळून नानाचे वाड्यात जाऊ तैसीच खिडकी उघडून जाऊ चालावे काळाने वहडून राव बोलले की तू बोलतोस हे चागले नाही आता दादासाहेबाकडेस जावे तेच वांचवतील इतकियात कवाडाजवळ सुमरसिंग ( १२४ ) आला कवाड लाविली होती तुक्या पोवार कवाड मोडितो रावसाहेब दुसरे वाटेने च्यापाजी मात्र बरोबर मग कोन्ही नाही ते दादासाहेबाकडे आले तो पोटात डोकी घांतली की प्रान वाचवावा ये मागे सुमरसिंगही आला दादासाहेबाणी काही म्हणाले परंतु तेव्हां अैकतो कोन टाग धरून वोढिला चापाजी अंगावर पडला सुमरसिंगाने वार दोन चाल विले त्याचे दोघे पुरे जाले ही गलबल बाहिर समजली जेवतराव नानाणी गंगाबाईस साठ्याचे घरांतून आणोन आपले वाड्यात ठेविली त्रिंबकराव मामाणी तोफा काहाडल्या गडीकडे आनिल्या सखारामपंतबापू व मोरोबादादा व नानाचे पागेपासी आले की गलबल काशाची आहे गोळीही वाजली दोन तीन बार ठोकले तो नानाही मागून आले बापूनी नानास म्हणाले की गर्दी काही चागली नाही कोनास माहीत नाही रावसाहेब धरन्याची सलाह कोन्हे दिल्ही गुजरात रीतीने रडू लागले इतक्यात नानापासी सिकापत्राची नकलच आली मोरोबादादा अमल भोळवट होते नानाची हुशारी भारी नानानी बापूस उत्तर केले की काय जे जाले असेल ते आप ( १२६ ) ले सल्हेसिवाये होनार नाही आम्हास काये विचयारिता नाना त्याचे अगीं लावीत बापू नाही म्हणेत अैसेही क्षेनभर जाले नाना बोलले असो जे होनार ते होईल आतून बातंनी तरी आनवावी काये आहे तेंव्हा बापूनी खिदमतगार आत पाठविला त्याची बातनी आली की रावसाहेब तर पारच जाले तेव्हा सखारामबापू आपले चितात साचले की धरन्यांचा मनसुबा होता आणि लागलाच मारला हे काही चांगले नाही बापू आपले ठिकाणी बांतनी आल्यावर दंग जाहेलं नाना म्हणाले की दंग का होता अैसे बोलतां बोलता पागेपासी नाना ( १२७ ) बोलले की आपणच करविले आता श्रमी न व्हावे क्रम चालो द्यावे बापू म्हणाले की हे काही मजला माहीत नाही नानानी कानासी सागितले की तुम्हीच करविले

तुमचा रुकार सिकापत्रावर पाहावे ते पाहून बापू कायेल जाले नानास म्हणाले की गोष्ट न फोडावी चुकली खरीं आता दुसरा नक्ष्या ठहराऊ उद्ईक तुमचे वाड्यात येईन हे बोलल्यानंतर नानानी हे प्रकर्ण टाकिले बापू व नाना म्हणाले की रावसाहेब याहास दहनं ( १२८ ) करवावे ये विषयी दादासाहेबाची परवानगी आनावी गारद्यासी कांहीं द्रव्ये देऊ केले होते ते दिल्हे तेव्हा बाहिर निघाली यास च्यार सहा घटका रात्र जाली बापू म्हणाले कीं त्याजकडे शहाना मनुष्य कोन पाठवावा तेव्हा गंगाराम भगवंत व मोरो गिरमाजी दिमत उचखानास या दोघास पाठविले की याचे दहनाविषयी काय आज्ञा दादासाहेबाणी बापू नाना व दादा वगैरेस सागून पाठविले की असे नव्हे त्याचे दैवाने अंगर आमचे दैवाने गोष्ट जाली आता दहन करवावे इतके रात्री ( १२९ ) स दहन केले —कलम

१ सखाराम बापू दुसरे दिवशी नानाचे वाडयात प्राथकाळी आले नानास म्हणाले की धरावे ही सलाह माझी मारावे ही सलाह माझी नाही अक्षरे कोन्ही ही 'धं' चा 'मा' केला हे न कळे नाना म्हणाले की आता याची सलाह काय बापू बोलले कीं गंगाबाई कोठे आहे तो पावेतो बापूस गंगाबाईची बातंनी नव्हंती नाना बोलले की बाई येथे आहे बहुत चांगले आहे बाई गरोदर आहे काही चिंता नाही तुम्ही राज्या ( १३० ) कडील इलाकेदार आहांत मी त्याची चाकरी त्यास सरदार मानकरी व पांगे चागले पाहून तुम्ही फोड करावी वेगळा ऐवज लाऊ तूर्त तुम्ही नमूंद न व्हावे व त्रिंबकरावमामास पुढे करावे आंतून तुम्ही तुम्हाजवळ मी जे तुम्ही कराल त्यात मी आहे ऐसे बहुता प्रकारे बोलणी उभयताची जाली नानानी उतर केले की मी इतकेही करीन परंतु आपला भरवसा मला येत नाही तोडघंसी घाल ऐसे न व्हाये तेव्हा बापूनी नानास इमान उचलून ( १३१ ) दिल्हे नंतर गंगाबांईचे या त्रिवर्गाचे इमान जाले ऐसे होऊन बापू आपले घरास गेले तिकडे दादासाहेब याणी कचेरीची बातंनी आनविली तों दरबारास मुतसंदी कोन्हीच नाहीत बापूस बोलाऊ पाठविले बापू गेले मागून मारोपंतदादाही बोलाऊन नेले उभेयतास दादासाहेब म्हणाले की गोष्ट तर चुकली आता पूर्वताप्रमानें गाडा चालू द्यावा बापू म्हणाले की आम्हास काये उभयेता मालक (१३२) आहा कोन्हाचीही चाकरी करावी नानास बोलाऊ पाठविले नाना आले नाहीत उत्तर आले की दादा आहेत तेथे मीच आहे आज प्रकृती स्वस्थ नाही बापूस दादासाहेबानी म्हणाले

की ते संवशई आहेत त्याची खातरजमा करुन घेऊन येतो चिता नाही ते आपले सिवाये नाहीत वरकड लहांण थोर यास आणोन त्याची खांतरजमा केली तिकडे नानानी त्रिंबकराव मामास बोलाऊन आणून त्यास मजकूर सागि (१३३) तला कीं बापूचा आमचा असा बेत जाला आहे तुम्हीं बाईस घेऊन पुरंधरास जावे संमागमे हरीपंत यास दिल्हे मागून येतील ते तुम्हाकडे पाठवू मामापासी पंचवीस हजार त्याचे हुकमानसी जमियत देविली तेच दिवसी बाईस घेऊन गेले किलेदारास नानानी व बापूनी पत्र दिल्ही किल्यास दाखल जाले ही बांतनी बाई व मामा गेल्याची दादासाहेबास लागली फितूर होन्यास करिता बापूनी सागितले की आपणाजवळ आहेत एक मामा नसल्यस याणी काये (१३४) करन्याचे आहे त्याचाही बंदोबस्त करू नंतर नानानी काही पागे व मानकरी दाहापाच याचे मिळणीत यावयाचे त्यास बोलाऊन आणोन खातरजमा करुन त्यास मामाकडे पाठविले महादजी सिंदे व तुकोजी होळकर याचे अणुसंधान नानाकडे ही बांतनी कारयाकारण मजकूर मारोबादादास समजाविला रामशास्त्रीस दादासाहेबाणी प्रायेचित्ताचे विच्यारिले त्यास त्याची याची बोलाचाली जाली ते वाईस गेले इकडे नवाबाणी पंचावन लक्षाचां मुलुक दाबला बारा दिवस रावसाहेब याचे जाले आणिक नानास (१३५) बोलाऊं पाटविले नानानी जेवाब दिल्हा मंग मोरोबादादा येऊन नानास घेऊन गेले त्याची खांतरजमा दादासाहेबाणी केली नंतर बेदरावर आले ही बातणी यास समजल्यावर याणीही कूच केला तिकडे मामाणी पंचवीस हजार फौज नवी ठेविली बेदरावर सखारामबापू व नाना व दादासुद्धा आहे बेदरचे दान गावा फौज समे कारन नवाबाणी संदा पाठविल्या त्या माघार आल्या आणि त्यास इतके सागितले की गंगाबाई व त्रिंबकरावमामा याणी आट केला आहे त्यास तुम्ही सामिल न व्हावे मोगलाई कारखा (१३६) ना करून हीच पुरे उत्तम आहे अगत्य स्वागत्य जाले नानानी दुसणे कहांडले निरोप मागितला मागून बापूनी व मारोबादादाणी निरोप घेतला निरोप दोघास देत नव्हते चिंतोपंत दादासाहेब अतरंग कारभारी होते त्याचे तन्हे असले म्हणजे खडंत न होते ते जाणून त्यांनी बुद्धिवांद देऊन निरोप देविला ते तिघे पुरधरास आले तेव्हा दादासाहेबास समजले की नाना व दादाचा भरोसा नव्हता बापूचा भरोसा होता परंतु तेही तिकडे मिळाले मामाही पुरधराहून फौज घेऊन अलीकडे आले सिंदे होळकर याणी दादासाहेबास याचा निरोप हिंदुस्थानास जान्यांचा घेतला गंग-

पावेतो गेले तेव्हा स्पष्ट फितुर समजला मामासाहेब व दादासाहेब याची लढाई पंढरपुराजवळ जाली नबी फौज होती कच खाली मामा धरले गेले कांही निकटीचे मानसे व हारीपंत किनारा घेऊन होते दादासाहेबाणी हिंदुस्थांनाचा रस्ता धरला मामाची अप्रतिष्ठा फार जाली खडकतावर काळ जाला बापूनी व नानाणी ते वेळेस हरीपतास वस्त्र सरदारीचे देऊन फौज जमवून सिंदे होळकरही येऊन मिळाले पुढे दादासाहेब मध्ये नबाब मागे हरीपंत अैसे बुऱ्हाणपूर पावेतो गेले तेथून नबाब निज्यामअलीखां बाहादुर वराडांत गेले दादासाहेबाबरोबर जरीपटका होता व मानकरी पांगा वगैरे होते तितक्यावर सरमजामावर घरावर जप्त्या नानांनी पाठविल्या तेव्हा लोकानी अडविले की तुमी देसी चलावे हरीपंतास लुटू नानाचे पारपत्य करूं नाहीतर आम्ही जरीपटका घेऊन हरीपंताकडे जितके आले ( ति ) तक्याचया जप्त्या मोकळया केल्या सुमरसिंग तेथून फुटला शेवटीं दादासाहेब च्यार ( १३९ ) हजार फौजनसी मानाजी फाकडे व रानोजी धाडंगे हे त्यात अग्रसेना इकडे गेले हरीपंत याणी सुमरसिंगास धरुन बोटास चिध्या बांधून आणि आंग देऊन मारला तुक्या पवार यास नानानी धरुन हरीपंत देसी आले गंगाबाईचे नावे कागजपत्र चालू लागले मा। द् अलीखा उर्फ वालाज्याहा यास आग्रेजानी कैद केले मुलुक अगोधरच र ( म. फा. ) ( १४० ) कर्जी घेतला होताच दरोबस्त चिनापटणासुधा अग्रेजी अमल

१ सन ११८४ फसली

१ सवाई माधवराव याचा जेन्म जाला तो आनंद बापू व नाना व दादास काये पुसावयाचे आहे सर्वत्रास खुसी जाली साकरा वाटल्या

१ नबाब याचे दिवान रकुनतदौला आलजपुराकडे गेले कारन नबाब जातीने धोंडो शंकर यास ( म. फा. ) विले घेऊन काम करून लागला हयेदराबादेस ( म. फा. ) दाखल जाले

१ माधवराव साहेब याहास जेवाहिर व वस्त्रें नबाबाणी नानाजीशंकर याजबा। र पा।ले ते वेळेस अखबारनवीसीचे कामावर पुरधरास नानाजीपतांनी हैयबतराव गोपाळ यास ठविले

१ सन ११८५ फसली

१ मोरोबादादानी फितुर केला कीं बापू व नानास धरून आपण कारभार गंगाबाईचा करावा अशी बातंनी नानास समजताच दादास धरोन नंगरचे किल्यात ठेविले

१ जिवाजी रघुनाथ यास हायेद्रा ( बादचे वकी ) लीचे कामावर पाठविले घोंडो ( म. फा. ) ( १४२ ) घेतले मुख्ये वकील कृष्णराव बलाळ

१ सखांरामपंतबापूकडे दादासाहेबाचे पत्रे साफच आली नानास दाखविली याचे उतरही याचेच समोर दिल्हे येसी एक दोन पत्रे ( वृत्त ) आली तिसर पत्र आले बापूचे उतर किवा भिवराव पानसे लिहीत होते त्यात पत्रात लिहिले की तुम्ही इकडे यावे मी नानास धरितो हे अक्षरे बापूनी वाचावी ती न वाचोन तेसी विनंती करून दिल्ही ते पत्रेच नानाचे णिर्धर तु ( म. फा. ) जी सिंदे याजकडून बापूस ( म. फा. ) ठेविले कैद करावे ते वे ( म. फा. ) ( १४३ ) ळस बापू बोलले की याचे कारण काये तेव्हा पाटील बाबानीं पत्रेच दाखविली याजवरून बापू बोलले कीं मला माहित नाहींत मग कोण येकतो किरकोल कोन्ही जीव दिले बाकी किल्यावर टाकिले हरीपंत तात्या व गणेशपंत बेहेरे...इकडे गेले तेथे दादासाहेबासी लढाई जाली दादासाहेब पळाले हरीपंत तात्याणी सामही करून पाहिला परंतु याचे मानस इकडे येयाचे नाही सुरतेस गेले बाहेर यास ठेवून तात्या इकडे आले

१ सन ११८६

हैद्र नायकाकडे ( म. फा. ) याणी गेले ( १४४ ) पत्र पाहता ( म. फा. ) आणि असावे ( म. फाटला )..............................

... ( मजकूर फाटला ) ........................................

करीत ............ ( म. फाटला ) .................. णी ............

हरीपंत तात्या ..............................................

तणी लागले ..............................................

दु ..............................................

चवक ..............................................

यासी लष्क ..............................................

हे अंग्रेजास ..............................................

हैद्र नायका ( स ) ..............................................

वासवारी ..............................................

# बखरींतील कठिण शब्दांचे अर्थ

( अ. ) = अरबी; ( फा. ) = फारशी

### अ

**अकसीनें** ( अ. ), मत्सरानें; खुनशीपणानें.

**अर्जुनी** ( अ. ), सविनय.

**अभर**, अभ्र; ढग.

**अमल ज्यारी करणें** ( अ. ), अधिकार अथवा संप्रदाय रूढ करणें.

**अवग्र**, सगळी; समग्र.

**असबाब** ( अ. अस्बाब ), सामुग्री; सामान.

**असील** ( अ. अशिल ), मानकरीण दासी.

**अक्षेनें** ( अ. अकसी ), मत्सरानें; खुनशीपणानें.

**अंतर**, मनांतील आशय.

**अंदेशा** ( फा. ), संशय; विचार.

### आ

**आखर** ( अ. ), अंत; निधन.

**आट**, अट.

**आवई**, कंडी; लोकवार्ता

### इ

**इजाहार** ( अ. ), प्रसिद्धीकरण.

**इतमानानें** ( अ. एहतमाम् ), व्यवस्थेनें.

### उ

**उचल**, उधारी.

**उजागरीणें**, उजळ माथ्यानें.

**उठाने**, उत्तेजन.

### औ

**औडभर**, नांगरभर.

### क

**कटक**, वैर; काट; मनांतील डूग.

**कसूर** ( अ. ), अपराध.

**काबिल** ( अ. ), कर्तबगार; योग्य.

**कायेल** ( अ. ), सहमत; निरुत्तर.

**किताब** ( अ. खिताब ), संबोधन; पदवी.

### ख

**खडंत**, अडत.

**खफा** ( फा. ), रुष्ट

**खातरजमा** ( अ. ), समजूत.

**खालशात** ( फा. ) मुख्य सरकारची जमीन.

**खाविंद** ( फा. ) स्वामी.

**खाशांत** ( अ. ) विशिष्ट ठिकाणीं; एकांतांत.

**खासा** ( अ. ), मुख्य व्यक्ती.

**खिदमतगार** ( फा. ), सेवक; परिचारक.

**खिलत** ( अ. ), सन्मानाचा पोषाख.

**खुदस्तबुनियाद** ( खुदस्तेबुनियाद ), मुसलमानी राजवटींतलें औरंगाबाद शहराचें नांव; भाग्यशाली गोष्टींचा पाया असलेलें ( ठिकाण ).

### ग

**गछे**, गमन

**गणीम** ( अ. ), शत्रू; मराठ्यांस मुसलमानांनीं दिलेलें नांव.

**गर्दिश** ( फा. ), संकटाचा फेरा.

**गलबाल** ( अ. ) धामधूम.

**गस्त** ( फा. ), फिरती.

**गाफलीनें** ( फा. ), गैरसावधपणानें; निष्काळजीपणानें.

**गारंद** ( अ. ), उध्वस्त; नष्ट.

**गिलचे**, गिलके; घोसाळ; घोष करणारा; आवाज करणारा.

**गिला** ( फा. ), तक्रार; ओरड.

**गुजरात रीतीनें रडणें**, खरें दुःख नसतांना कृत्रिमपणें आक्रंदन करणें.

**गैरवाका** ( अ. ), असत्य; जसें घडलें नाहीं तसें ( सांगणें ).

## च

**चालवनें**, परामर्ष घेणें; अन्नवस्त्राची तरतूद करणें.

**चेंडूली**, सैन्याच्या पिछाडीची रक्षक फौज.

**चोपदार** ( फा. ), हातीं काठी धरणारा सेवक.

**चोळीदामनचा**, चोळी व तिची किनार याप्रमाणें संलग्नता असलेला.

## ज

**जगन्यात**, जग जाहीर होणें.

**जमियेत** ( अ. ), जमाव.

**जरजेर**, जर्जर; घायाळ.

**जर्जेर**, ' जरजेर ' पाहा.

**जरबंद** ( फा. जर्बंद ), जीन आवळून धरणारा घोड्याच्या पोटाखालून जाणारा पट्टा.

**जरीपटका**, मराठ्यांचे छत्रपती राजाराम महाराज यांच्या कालापासून माननीय झालेलें राष्ट्रीय निशाण.

**जातजागीर** ( अ. ), वंशपरंपरा नव्हे तर स्वतः पुरती मिळालेली जागीर.

**जाया** ( अ. ), घायाळ.

**जिकर** ( अ. जिक्रि ), प्रश्न; गोष्ट; कटकट.

**जुजबी** ( फा. ), साधारण; किरकोळ.

**जेबाब दर जेबाब** ( फा. ), उत्तर प्रतिउत्तर.

**जोरतलबी** ( अ. जोरतलबी ), आग्रहाची मागणी.

**ज्याफती** ( अ. ), जाफत; मेजवानी; आतिथ्य.

**ज्याहादार** ( फा. जहांदार ), जगताचा स्वामी.

## ड

**डवला**, डौल; माडणी; ढब; दिमाख.

## त

**तकडबंदी**, सर्वांगीण नियंत्रण.

**तन्हे** ( फा. ), एकटा.

( टीपः–प्रस्तुत बखरींत ज्या संदर्भात हा शब्द वापरला आहे त्यास अनुसरून या शब्दाचा अर्थनिर्णय 'बरोबर' 'संगतींत' असा लावतां येईल. परंतु मूळ अर्थ तसा नाहीं; 'बरोबर' 'संगतींत' या अर्थाचा फारशींत जो प्रतिशब्द आहे तो 'तन्हे' नसून 'तर्यी' असा आहे. )

**तयेनाती** ( अ. ), नेमणूक; पगार.

**तलब चहडली** ( अ. ), मागणी वाढली.
**तसंदी** ( अ. ), श्रम; त्रास.
**तुटेफाटे**, क्षुल्लक; तुरळक.

द

**दरबार आलम** ( अ. ), साधारण राजसभा.
**दरोबस्त** ( फा. ), पूर्ण; सर्व.
**दाही**, द्वाही; दवंडी.
**द्वांमोशाचे**, दुटप्पी; अस्पष्ट.
**दिवाभीत**, भित्रा; घुबड.

न

**नकशा ठहेराऊ** ( अ. ), योजना निश्चित करूं.
**नजर** ( अ. ), भेट; दृष्टी.
**नमूद** ( फा. ), प्रगट.
**नाइतफाक** ( अ. ), सलोख्याचा अभाव; असहकार.
**नाहक** ( अ. ), विनाकारण.
**निछये**, निश्चय.

प

**पयेगाम** ( फा. ), संदेश; निरोप.
**पयेवरवी** ( फा. पैरवी ), पाठलाग; खटपट.
**पल्यावर**, लांबणीवर.
**पाराबावी**, विश्वसनीय ( ? )
**पायेरीस पाय लावणें**, आदरणीय वस्तूचा अपमान करणें.
**प्रावले**, प्राबल्य.
**पुरावत**, पुरावा.
**पूरा जाला**, मृत्यु पावला; निकाल लागला.
**पूर्वांतर**, पूर्वीप्रमाणें.
**पेशाकब्ज** ( फा. ), कट्यार.
**पोत्र्यास**, नातवास.

फ

**फंद** ( फा. ), व्यसन; कुटिल क्लृप्ती.
**फुलचरी**, पांदिचरी ( Pondicherry ).

भ

**भरोभरी**, उद्युक्त करणें.

म

**मशारनिले** ( अ. ), उपरिनिर्दिष्ट.
**मंजुमदार** ( फा. मजमुयेदार ), वसुलाचा हिशेब तपासनीस.
**मातबर** ( फा. ), विश्वासू.
**मातंबरी** ( फा. ), विश्वासू; समृद्ध.
**मामलत** ( अ. ), उद्योग; कार्य.
**मामले** ( अ. ), विषय; संबंध.
**माहाल** ( फा. ), तालुक्याचा पोटभाग.
**माहीमरातब**, एक प्रकारचा मोठा मान.
**मिंजुमले** ( फा. ), एकंदरीनें.
**मुदबाखा** ( अ. ), स्वयंपाकी; स्वयंपाक.
**मुनादी** ( अ. ), दौंडी.
**मुपसंद, मुफसद** ( फा. ), पुंड; बखेडखोर.
**मुलतवी** ( अ. ), पुढें ढकलणें; निरोधन करणें.

य

**येलची** ( तुर्की एल्ची ), वकील.

र

**रतकर्ज** ( अ. ), कर्जफेड.

**रसदबंदी** ( फा. ), धान्य, दाणा, वैरण इत्यादिकांचें नियंत्रण.

**रसद**, धान्य; दाणा; दारूगोळा; सामुग्री.

**रुकसत** ( अ. ), परवानगी; सुटी.

**रुजुवाद** ( अ. ), समक्ष ताडून पाहाणें.

**रुजू** ( अ. ), दाखल; निष्ठा.

**रूबकार** ( फा. ), सन्मुख; फलदायी.

**रूबरू** ( फा. ), समोर.

### ल

**लगा**, सोईनें; धोरणानें; धागादोरा; सूत.

**लवाजमियान**, मोठेपणाचीं सर्व चिन्हें व परिवार.

### व

**वजारतीचें** ( अ. ), प्रधानकीचें.

**वाट खाली**, कच खाली.

### स

**सफाई** ( फा. ), समेट; नकार्की.

**सरंजाम**, साधन सामुग्री; निकाल.

**सरेन**, शरण.

**सलतन** ( अ. ), राज्य.

**सलाह** ( अ. ), योग्य हितवाद.

**सलूक** ( अ. ), सलोखा; सख्य.

**सवदागर** ( फा. ), व्यापारी.

**स्वस्थान**, संस्थान.

**सागड**, तीक्ष्ण टोक असलेली लांब सळई.

**सानी** ( अ. ), दुसरा.

**सामोच्यारे**, 'सामोपचार' याचा अपभ्रंश.

**सिबंदी**, शिबंदी; वसूलीच्या कामासाठीं ठेविलेली फौज; किल्याच्या संरक्षणार्थ ठेविलेली फौज.

### ह

**हजरत** ( अ. ), राजा, पैगंबर, इमामादि वंद्य पुरुषांस या शब्दानें, स्वामी या अर्थानें, संबोधितात.

**हायेरान** ( अ. ), हैरान; आश्चर्यचकित, त्रस्त.

**हवाल** ( अ. ), अहवाल; वृत्तांत; हकीकत.

**हिसका**, हिसडा.

**हुजरे**, निकटवर्ती सेवक.

# सूची

## व्यक्तिनिर्देश

---

## स्थलनिर्देश

---

प्रकाशकः—एम्. **नसीरुद्दीन खान,** डायरेक्टर, दफ्तरे दिवानी सार्ते, हैद्राबाद सरकार, हैद्राबाद दक्षिण.

मुद्रकः—**केशव गणेश शारंगपाणी,** आर्यभूषण मुद्रणालय, ९१५।१ शिवाजीनगर, पुणें ४.